**प्रत्येक प्रशासकीय विभागाने सन २०१७ ते २०१९ या तीन वर्षाच्या कालावधीमध्ये ५० कोटी वृक्ष लागवड, संगोपन आणि देखभाल या कार्यक्रमांतर्गत दिलेल्या उद्दीष्टासंदर्भात नियोजन आराखडा व कृती कार्यक्रम तयार करुन अंमलबजावणी करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२२/पापु-०२**
गो.ते.रुग्णालय संकूल इमारत, ७ वा मजला,
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
तारीख: १५.१२.२०१६

**वाचा**

**१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग, क्रमांक सावलि-२०१५/प्र.क्र.१३१/फ-११, दि.३१.३.२०१६**
**२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग, क्रमांक सावलि-२०१६/प्र.क्र.८०/फ-११, दि.१०.१०.२०१६**

**शासन परिपत्रक**

जागतिक तापमानातील वाढ, हवामान व ऋतू बदल याची दाहकता व तीव्रता कमी करण्यासाठी मोठ्या प्रमाणात वृक्ष लागवड हाती घेण्याचे महत्व वैश्विक स्तरावर मान्य झालेले आहे. ह्या उपक्रमाचा भाग म्हणून संदर्भ क्रमांक १ येथे नमूद शासन निर्णयान्वये दिनांक १ जुलै, २०१६ रोजी एकाच दिवशी २ कोटी वृक्ष लागवड करण्याचा महत्वाकांक्षी व धडक कार्यक्रम शासनाने हाती घेतला होता. त्यावेळी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचा त्या कार्यक्रमात समावेश नव्हता. तथापि, मा. प्रधान सचिव (पा.पु. व स्व.वि.) यांच्या पुढाकाराने या विभागाने सामाजिक बांधीलकी म्हणून उत्स्फुर्तपणे या मोहिमेत भाग घेतला होता. जनतेच्या उत्स्फुर्त सहभागामुळे दिनांक १ जुलै, २०१६ रोजी एकंदर २.८२ कोटी वृक्ष लागवड करण्यात आली. हा कार्यक्रम लोकचळवळीमध्ये रुपांतरीत करण्यास शासनास चांगले यश प्राप्त झालेले आहे. मा. पंतप्रधान यांनी दिनांक ३१ जुलै, २०१६ रोजीच्या मन की बात या रेडिओवरुन प्रसारीत होणाऱ्या कार्यक्रमामध्ये वन विभागामार्फत राबविण्यात आलेल्या २ कोटी वृक्षारोपण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीबाबत अभिनंदन केले. त्याचबरोबर यापुढील वर्षामध्ये हाती घेण्यात येणाऱ्या कार्यक्रमाबाबत देखील सूतोवाच केले व वृक्ष लागवडीच्या कार्यक्रमात सातत्य ठेवण्याबाबत आवाहन केले.

२. ब्राझील मधील रिओ-दी-जानीरो येथे दिनांक ६ ऑगस्ट, २०१६ रोजी ऑलिंपिक सोहळ्याचे उदघाटन अत्यंत दिमाखदरपणे संपन्न झाले. या जागतिक सोहळ्यात भारतासह २०५ देश सहभागी झाले होते. या दिवशी वृक्षलागवडीचे महत्व, पर्यावरणाचे रक्षण आणि जागतिक तापमानात होणाऱ्या

वाढीची तीव्रता कमी करणे (Mitigation of Global Warming) इत्यादी संदर्भातील महत्व विशद करणाऱ्या खालील संदेशांचे दमदार सादरीकरण झाले :-

**पृथ्वीच्या होत असलेल्या हानीला थांबविणे पुरेसे नाही, तर पृथ्वीला पर्यावरण ऱ्हासाच्या संकटापासून वाचविण्याची वेळ आलेली आहे. वृक्ष लावा, पृथ्वीला वाचवा हा ऑलिंपिकचा संदेश आहे.**

**चला, एकत्र येऊन पृथ्वी वाचवूया. आपण प्रत्येकाने एक रोपटे लावण्याचा संकल्प करुया.**

वरील संदेश लोकांच्या मनाला भिडणारे असून, त्यातून वृक्षलागवडीचे महत्व अधोरेखित होते. वसुंधरेला वाचविण्याची आर्त हाक त्यातून दिली जात आहे.

३. वर नमूद पार्श्वभूमीवर वृक्षारोपणाची गती तुटू न देता ती पुढे सुरु ठेवणे अत्यंत आवश्यक आहे. त्या अनुषंगाने पुढील ३ वर्षामध्ये ५० कोटी वृक्षारोपणाचे उद्दीष्ट मा.मुख्यमंत्री यांच्या मान्यतेने शासनाने संदर्भाधीन क्रमांक २ येथील महसूल व वन विभागाच्या शासन निर्णयान्वये निश्चित केले आहे. त्याचप्रमाणे ५० कोटी वृक्षारोपणाच्या अंमलबजावणीबाबत सविस्तर मार्गदर्शक सुचना निर्गमित केल्या आहेत.

४. दिनांक १ जुलै, २०१६ रोजी झालेल्या वृक्षारोपणाच्या कार्यक्रमामध्ये २१ विभाग सहभागी झाले होते. पुढील काळात जवळपास सर्व ३३ शासकीय विभाग (संसदीय कार्य विभाग वगळून) व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालये, निमशासकीय मंडळे व महामंडळे यांचा समावेश या कार्यक्रमात करण्यात आला आहे. त्यानुसार संपूर्ण शासन यंत्रणेला या कार्यक्रमात समाविष्ट करुन घेण्याचा मानस आहे. प्रत्येक विभाग आणि त्याअंतर्गत मंडळे/महामंडळे यांच्याकरिता वृक्षारोपणाची उद्दीष्टे निश्चित करताना, जिथे वृक्ष लागवडीस अधिक वाव आहे ती महत्तम क्षमता विचारात घेतली आहे. त्यानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णय, महसूल व वन विभाग दिनांक १० ऑक्टोबर, २०१६ मधील विवरण पत्र क्रमांक ३ मध्ये नमूद आणि मा. मुख्य सचिव व मा. मुख्यमंत्री यांच्या मान्यतेनुसार **पुढील ३ वर्षाकरिता सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे उद्दीष्ट व वृक्षारोपणाची संभाव्य स्थळे निश्चित करुन देण्यात आलेली आहेत.**

५. **पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग आणि त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय नियंत्रक अधिकाऱ्यांना त्यांना दिलेल्या वृक्ष लागवड उद्दीष्टानुसार क्षेत्रिय यंत्रणांना अंतर्गत वाटप करण्याची पूर्णतः मुभा राहिल.**

६. **वृक्षारोपणाचा कालावधी हा दरवर्षी दिनांक १५ जून ते ७ जुलै असा राहिल. तथापि, राज्यातील निरनिराळ्या विभागामध्ये पावसाची सुरुवात आणि आवक सर्वसाधारणपणे १५ जून नंतर वेगवेगळ्या वेळी होते. त्यामुळे त्या त्या वर्षाच्या पावसाचा अंदाज घेऊन विभाग निहाय आणि जिल्हानिहाय दिलेली उद्दीष्टे पूर्ण करण्याबाबत त्या त्या वर्षात परिस्थितीनुसार लवचिकता (Flexibility) ठेवण्यात येईल.**

७. महसूल व वन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक २ येथील दि.१० ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यक्रमाचा सूक्ष आराखडा तयार करणे, त्या त्या

वर्षातील वृक्ष लागवडीसाठी अक्षांश व रेखांशासह स्थळ निश्चिती करणे, निकषाप्रमाणे खड्डे तयार करणे, जून-जुलै मधील वृक्ष लागवड, वृक्ष लागवडीचा प्रत्यक्षदर्शी अहवाल (Real Time Reporting) आणि अंतिमत: संगोपन या विषयी सदर शासन निर्णयात विहित केलेल्या कार्यपद्धतीप्रमाणे दिलेल्या कालमर्यादेत कार्यवाही करावी. तसेच याबाबतची माहिती विवरणपत्र-१ आणि २ मध्ये विहित केलेल्या प्रपत्रात प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), नागपूर व सचिव (वने) यांना पाठविण्यात यावी. तसेच प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांना विभागाची माहिती स्वतंत्रपणे पाठवावी.

८. वृक्षारोपणाचा दृष्य परिणाम दिसून येण्यासाठी संवर्धन, पाणीपुरवठा, जनावरांपासून रोपांच्या संरक्षणासाठी जैविक किंवा तारांचे/प्लॅस्टीक कुंपण, कायम स्वरुपी देखभाल, जोपासना व संगोपन इत्यादी कामांचा नियोजन आराखडा तयार करावा व त्यानुसार कार्यवाही व्हावी. तसेच या वृक्षांचे जिवंत राहण्याचे प्रमाण (Survival Rate) किमान ८० % ते ९०% राहणेबाबत काळजी घ्यावी.

१०. या कार्यक्रमांतर्गत होणारा खर्च मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच आवश्यक तेथे सी.एस.आर. फंडातून उपलब्ध करुन घ्यावी. जिथे निधीची अडचण असेल त्या ठिकाणी वन व सामाजिक वनीकरण विभागामार्फत रोपे देण्याचा प्रयत्न केला जाईल.त्याबाबतची आवश्यक ती नोंद आणि लेखा इत्यादीबाबत रोपे उपलब्ध करुन घेणारा विभाग व रोपे उपलब्ध करुन देणारा विभाग अशा दोन्ही विभागांमार्फत ठेवण्यात यावा. तसेच याबाबतची माहिती प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर सचिव (वने) आणि या विभागास पाठविण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२१५११४८२४३९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2016.12.15 15:51:36 +05'30'

(म.भ. सावंत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सह सचिव (वने), महसूल व वन विभाग (फ-११), मंत्रालय, मंबई-३२
२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्रधिकारण, एक्स्प्रेस टॉवर्स, नरीमन पॉईंट, मुंबई
३. संचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
४. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

६. उप सचिव (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
७. मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
८. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव
९. अवर सचिव/कक्ष अधिकारी (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१०. प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे स्वीय सहायक
११. निवडनस्ती (पापु-०२)

| | वृक्षारोपणांची रोपणासाठी संभाव्य स्थळे | सन२०१७ (एकूण उद्दीष्ट ७५ लाख) | | सन २०१८ (एकूण उद्दीष्ट २.५ कोटी) | | सन २०१९ (एकूण उद्दीष्ट ६.२५ कोटी) | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रति कार्यालय | एकूण | प्रति कार्यालय | एकूण | प्रति कार्यालय | एकूण |
| विभागाचे नाव | २) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कार्यालये, सिडको भवन, नवी मुबई (सर्व) व त्यांचे अधिपत्या- खालील सर्व कार्यालये (एकूण ५) | ३१२ | १५६० | १०४० | ५२०० | २६०० | १३००० |
| | ३) अधिक्षक अभियंता/ कार्यकारी अभियंता कार्यालये मजिप्रा(एकूण ३४) | ३१२ | १०६०८ | १०४० | ३५३६० | २६०० | ८८४०० |
| | ४) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई व त्यांचे अधिपत्याखालील सर्व कार्यालये | ३७२ | ३७२ | १२४० | १२४० | ३१०० | ३१०० |
| | ५)जलस्वराज्य-२ कार्यक्रम, सहाय्यकारी संस्था (१२) कार्यालयांचा परिसर | ३१२ | ३७४४ | १०४० | १२४८० | २६०० | ३१२०० |
| | ६) संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा पुणे व त्यांचे अधिपत्याखालील सर्व कार्यालये (एकूण ३४) | ३१२ | १०६०८ | १०४० | ३५३६० | २६०० | ८८४०० |
| | **एकूण** | | **३७५००** | | **१२५०००** | | **३१२५००** |